पंचायत समिती, दक्षिण सोलापूर (जि. सोलापूर) नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर या उपकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०२२/प्र.क्र.१२२/बांधकाम-०४

५ वा मजला, २५ मर्झबान पथ, बांधकाम भवन,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

तारीख : २७ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.पंसई-२०१३/प्र.क्र.६४/पंरा-०७, दिनांक ०३ ऑगस्ट, २०१३.

२) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांचे पत्र क्रमांकः** क्र./जिपसो/बांखा-१/प्रकल्प-४/७८८/२०१९, दिनांक ०५ सप्टेंबर, २०१९.

३) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांचे पत्र क्रमांकः** क्र./जिपसो/बांखा-१/प्रकल्प-४/३३२/२०२२, दिनांक २१ नोव्हेंबर, २०२२.

**प्रस्तावना :-**

अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी वाचा मधील अनुक्रमांक २ व ३ येथील पत्रांन्वये दक्षिण सोलापूर पंचायत समितीच्या (जि. सोलापूर) नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर या उपकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

०२. उक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक ०३ ऑगस्ट, २०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये, पंचायत समिती, दक्षिण सोलापूर (जि. सोलापूर) येथील प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाच्या रू.२०१.१७ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी प्रस्तावित केल्यानुसार, पंचायत समिती, दक्षिण सोलापूर (जि. सोलापूर) येथील प्रशासकीय इमारतीचे काम पूर्ण झालेले असून सदर इमारत मागील दोन वर्षापासुन वापरात आहे. सदर इमारतीत कर्मचारी यांना कार्यालयीन कामकाजासाठी कक्ष तयार करुन नविन बैठक व्यवस्था, टेबल, खुर्च्या, कपाटे इ. मॉड्युलर फर्निचरची अत्यंत आवश्यक आहे. याकरीता कार्यकारी अभियंता (बांध), जिल्हा परिषद, सोलापूर यांनी पंचायत समिती, दक्षिण सोलापूर (जि. सोलापूर) येथील प्रशासकीय इमारतीकरिता

फर्निचर या उपकामांचे अंदाजपत्रक सादर केलेले आहे. सदर अंदाजपत्रक सन २०२२ - २३ च्या दरसूचीवर आधारित असून ते कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, सोलापूर यांनी साक्षांकीत केलेले आहे. सदर अंदाजपत्रकासोबत पंचायत समितीच्या ठरावाची प्रत, नकाशा, सादर करण्यात आली आहे.

०३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती, दक्षिण सोलापूर पंचायत समितीच्या (जि. सोलापूर) नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर या उपकामाच्या रू.६५.३२ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पंचायत समिती, दक्षिण सोलापूर (जि. सोलापूर) नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर या उपकामाच्या एकूण रुपये ६५,३२,०००/- (रूपये पासष्ठ लक्ष बत्तीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) पंचायत समिती, दक्षिण सोलापूर (जि. सोलापूर) प्रशासकीय इमारतीकरिता शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर/मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करून घेणे बंधनकारक राहील.

२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

३) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती / जिल्हा परिषदेने सोसावा.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एका वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी नियोजन करावे.

५) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

६) प्रस्तुत कामे वेळेत पुर्ण करुन सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता भासणार नाही, या पद्धतीने पुर्ण करण्याची दक्षता घ्यावी.

०२. पंचायत समिती, दक्षिण सोलापूर (जि. सोलापूर) नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर या उपकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे.

| General Abstract for Furniture Sub Work of P. S.Dakshin Solapur Adm. Building, Dist. Solapur | | |
|---|---|---|
| **Sr.No.** | **Description of item** | **Cost In Rs.** |
| **1** | Work portion | 5102958.00 |
| **2** | Add 18.0 % GST | 918532.00 |
| **3** | Add 1 % Insurance | 510296.00 |
| | **Total** | **6531786.00** |
| | **Says in Rs.** | **65,32,000/-** |

**०३.** उपरोक्त बांधकामासाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरूपात, टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

०४. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, अ. क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र. १३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१५३४१७९८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2025.03.27 16:16:54 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
२) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
३) मा. मंत्री (ग्रा. वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे.
६) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर.

८) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर.
९) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर.
१०) कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, सोलापूर.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा सोलापूर.
१२) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१३) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, पुणे विभाग, पुणे.
१४) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, सोलापूर.
१५) सभापती, पंचायत समिती, दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर.
१६) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, दक्षिण सोलापूर, जि.सोलापूर.
१७) निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.